**<u>अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१०-११</u>**
**मागणी क्र.वाय-६, ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१२९ /पापु-१५,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक- ६ डिसेंबर,२०१०

**वाचा**- १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१०/सीआर ७१/अर्थसंकल्प-३ दिनांक १८ मे, २०१०
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३ दिनांक ३० जुलै, २०१०
३.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१२९/पापु १५ दिनांक २७ एप्रिल,२०१०, दिनांक २८ जून,२०१०, दिनांक २४ ऑगस्ट २०१०, दिनांक १६ सप्टेंबर,२०१० व दि.१३ ऑक्टोबर,२०१०

**<u>प्रस्तावना</u>:-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी विधिमंडळाला सादर करण्यात आलेला अर्थसंकल्प महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१० (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०१० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) विधिमंडळाने मंजूर केला आहे आणि ते २०१० चा अधिनियम क्रमांक ८ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण, भाग-८, दिनांक २७ एप्रिल, २०१० अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे. तसेच, विधानमंडळास सादर करण्यात आलेले सन २०१०-११ या वर्षाच्या खर्चाचे पूरक विवरणपत्र दि.३१ मार्च,२०११ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली असून ते महाराष्ट्र (द्धितीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम,२०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -२० ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २७ जुलै,२०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च " या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूद रु.१२८९.१६ लक्ष व पुरवणी मागणीद्धारे प्राप्त रु.७.४५ लक्ष याप्रमाणे एकूण रु. १२९६.८१ इतकी दत्तमत्त व रु.५.०० लक्ष इतकी भारित तरतूद करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च” या लेखाशीर्षाखाली रु. १२७१.०३ लक्ष (दत्तमत्त) व रु.५.०० लक्ष (भारीत) अनुदान संचालक,

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना मंजूर व मुक्त करण्यात आलेले आहे. आता, या लेखाशीर्षाखालील ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उपशीर्षाखाली रु.२५.५८ लक्ष (दत्तमत्त) अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी मासिक खर्च विवरणपत्रानुसार पुढील विवरणपत्रातील **स्तंभ-८** मध्ये दर्शविल्याप्रमाणे ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उपशीर्षाखाली **रु.२५.५८ लक्ष (रुपये पंचवीस लक्ष अठ्ठावन्न हजार फक्त) इतके दत्तमत्त** अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयान्वये मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | उपशिर्ष | सन २०१०-११ करिता मूळ मंजूर तरतूद | पुरवणी मागणी द्वारे उपलब्ध तरतूद | पुर्नवितरण | सन २०१०-११ करिता एकूण मंजूर तरतूद | आतापर्यंत संचालक, भू.स.वि. यंत्रणेस मंजूर केलेले अनुदान | **या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. | ८. |
| १. | **५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री** | १६१.५८ | ०.०० | -५०.०० | १११.५८ | ८६.०० | **२५.५८** |

२. सदर मंजूर तरतूदीतून संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे (Monthly Cash Flow) खर्च करावा. वरील खर्च च्मागणी क्र.वाय-६, ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च- (००) १०१-मृद सर्वेक्षण व चाचणी - (०१) (०१) एक - भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण याखालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११३९) दत्तमत (४४०२ ११४८) भारीतछ या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१०१२०७१६०७१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श. वि. दुर्वे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर(लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-२० (२ प्रती)
७. कक्ष अधिकारी,पापु-०४, पापु-२०

